सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये जिल्हा स्त्री रुग्णालय, भंडारा (१०० खाटा) कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक वैद्यकीय उपकरणे, साधन सामुग्री व फर्निचर खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष ४२१० ११०१ अंतर्गत "५२-यंत्रसामुग्री व साधन सामुग्री" अंतर्गत अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली वर उर्वरीत निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२३/प्र.क्र.१६८/आरोग्य-८

१० वा मजला, गोकुळादास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३१ मार्च, २०२४

वाचा :-

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-/३/जि.स्त्री.रुग्णालय.भंडारा/निधी/उपलब्धता/७०१७/२४ दि.०७.०३.२०२४ व दि.३१.०३.२०२४
२) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-/३/जि.स्त्री.रुग्णालय.भंडारा/निधी/उपलब्धता/८२५७/२४ दि.३१.०३.२०२४
३) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांची दि.३०.०३.२०२४ ची मान्य टिप्पणी.
४) शासन निर्णय समक्रमांक दि.०१.०९.२०२३ व दि.०३.११.२०२३

प्रस्तावना:-

सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन दिनांक ३१.०३.२०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये जिल्हा स्त्री रुग्णालय, भंडारा (१०० खाटा) कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक वैद्यकीय उपकरणे, साधन सामुग्री व फर्निचर खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष-४२१० ११०१ अंतर्गत "५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" या उद्दिष्टा खाली रु.११,६३,०९,३४५/- इतका निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये जिल्हा स्त्री रुग्णालय, भंडारा (१०० खाटा) कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक वैद्यकीय उपकरणे, साधन सामुग्री व फर्निचर खरेदी करण्यासाठी रु.११,६३,०९,३४५/- (अक्षरी रुपये अकरा कोटी त्रेसष्ट लाख नऊ हजार तीनशे पंचेचाळीस फक्त) इतका निधी खालील नमूद अटींच्या अधिन राहुन अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(अ) सदर अनुदान हे **"बिनशर्त"** सहायक अनुदान आहे. वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी कळविले असून, त्याबाबतचे

प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दि.१२एप्रिल,२०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची पूर्तता झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(ब) यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा व सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी प्रमाणित केलेले आहे.

(क) सदर निधी जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा यांच्या खात्यात जमा होणार असल्याने, सदर निधी वितिरत करुन खर्च करण्याची संपुर्ण जबाबदारी जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा व सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांची राहील.

(ड) सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी हा जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा यांच्यामार्फत पुरवठादारास/लाभार्थ्यांस वितरीत करण्यात येणार असुन, वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

(इ) शासनाकडुन यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता, त्याच प्रयोजनासाठी करण्यात येणार असल्याचे जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा व सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी प्रमाणित केले आहे. तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

**०२.** या कामी होणारा खर्च हा "मागणी क्रमांक आर-३, ४२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा, ११०-रुग्णालये व दवाखाने (०१) रुग्णालये व दवाखाने, (०१) (०४) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने, ५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, ४२१० ११०१" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

**०३.** जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा यांनी प्रस्तुत देयकाअंतर्गत खरेदी करण्यात आलेल्या साधन सामुग्रीची खरेदी, ही उद्योग विभागाच्या खरेदी धोरणानुसार करण्यात आल्याची व साधनसामुग्री प्रत्यक्षात पोहोच झाल्याची खातरजमा केल्यानंतर, त्याचबरोबर टर्न की बेसीस वरील काम मंजूर नमुना नकाशानुसार व तांत्रिक विनिर्देशनानुसार पूर्ण झाल्याचे व ते कार्यालयास हस्तांतरीत झाल्याची खातरजमा केल्याचे प्रमाणित केल्यानंतरच देयकाची अदायगी करण्याची दक्षता घ्यावी, तसे प्रमाणपत्र जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा यांनी आरोग्यसेवा आयुक्तालयास व शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

**०४.** या प्रकरणात निधी वितरीत करताना किंवा पुढील कार्यवाही करताना निवडणुक आयोगाने, तसेच सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनानुसार आदर्श आचर संहितीचे पालन होत आहे, याची दक्षता जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा यांनी तसेच आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी घ्यावी.

**०५.** हे आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४ अन्वये निर्गमित केलेल्या सूचनांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३११५१२२२७६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2024.03.31 17:37:55 +05'30'

**(चंद्रकांत ह. वडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर ),मुंबई.
४) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, भंडारा
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.
९) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.
१०) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३) निवडनस्ती (आरोग्य-८)